# लिपिक-टंकलेखक परीक्षा

**१. संवर्ग व पदे याबाबतचा संक्षिप्त तपशील** :-

**१.१** राज्य शासनाच्या सेवेतील लिपिक टंकलेखक, गट-क संवर्गातील पदे शासनाच्या मागणीनुसार व पदांच्या उपलब्धतेनुसार सदर परीक्षेमधून भरण्यात येतात :-

**१.२ पदांचा तपशील**: -

**१.२.१ संवर्ग** :- अराजपत्रित, गट - क, **पदे** - (**एक** ) लिपिक टंकलेखक - मराठी (**दोन**) लिपिक टंकलेखक - इंग्रजी

**१.२.२ नियुक्तीचे ठिकाण** :- पदे फक्त बृहन्मुंबईतील राज्य शासनाच्या कार्यालयाकरिताच आहेत.

**१.२.३ वेतनबँड व ग्रेड वेतन** :- रुपये ५,२०० - २०,२००, १,९०० अधिक महागाई भत्ता व नियमाप्रमाणे देय इतर भत्ते.

**१.२.४ उच्च पदावर बढतीची संधी** :- ज्येष्ठता व पात्रतेनुसार सहायक किंवा लघुलेखक तसेच पदोन्नतीसाठी सेवाप्रवेश नियमानुसार उपलब्ध असलेल्या संबंधित कार्यालयातील पदावर.

**१.३** शासनाच्या मागणीनुसार भरावयाच्या पदांचा तपशील, पदसंख्या, आरक्षण, अर्हता, इत्यादी बाबी जाहिरात/अधिसूचनेद्वारे उमेदवारांना उपलब्ध करून देण्यात येईल.

**२. परीक्षेचे टप्पे** :- फक्त लेखी परीक्षा. एकूण ४०० गुण

**३. अर्हता** :-

**३.१** महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (एस.एस. सी.) किंवा महाराष्ट्र शासनाने एस.एस.सी. शी समतुल्य म्हणून घोषित केलेली अर्हता.

**३.२** लिपिक टंकलेखक मराठी या पदासाठी - मराठी टंकलेखनाचा वेग किमान ३० शब्द प्रति मिनिट अथवा लिपिक टंकलेखक इंग्रजी या पदासाठी - इंग्रजी टंकलेखनाचा वेग किमान ४० शब्द प्रति मिनिट या अर्हतेचे शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र परीक्षा अथवा या उद्देशासाठी शासनाने समकक्ष म्हणून घोषित केलेली प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण.

**३.३** उमेदवाराला मराठी लिहिणे, वाचणे, बोलता येणे अत्यावश्यक आहे.

**४. शुल्क (फी)** :-

**४.१** प्रस्तुत परीक्षेंकरिता आयोगाकडून आकारण्यात येणारे शुल्क खालीलप्रमाणे आहे :-

| अमागास | मागासवर्ग | माजी सैनिक |
|---|---|---|
| रुपये ५१५/- | रुपये ३१५/- | रुपये १५/- |

**४.२** वि.जा.(अ),भ.ज.(ब),वि.मा.प्र.,भ.ज.(क),भ.ज.(ड) व इ.मा.व. प्रवर्गातील उन्नत व प्रगत गटात(क्रीमी लेअर) मोडणाऱ्या उमेदवारांना आरक्षणाचा व वयोमर्यादेचा फायदा देय नसल्याने त्यांनी अमागास उमेदवारांप्रमाणे परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

**४.३** उन्नत व प्रगत गटासंदर्भातील (क्रीमी लेअर)उत्पन्नाची मर्यादा तसेच अन्य तद्अनुषंगिक बाबी शासनाने वेळोवेळी जारी केलेल्या आदेशानुसार राहतील.

**४.४** दिनांक १ जानेवारी, १९६४ ते २५ मार्च, १९७१ या कालावधीत पूर्व पाकिस्तानातून स्थलांतर करून भारतामध्ये आलेल्या आणि दिनांक १ जून,१९६३ नंतर स्थलांतर करून भारतात आलेल्या मूळचे भारतीय असलेल्या श्रीलंकेतील स्वदेश प्रतावर्ती उमेदवारांनी कोणतेही परीक्षा शुल्क भरण्याची आवश्यकता नाही.

**५. परीक्षा योजना** :-

**५.१ प्रश्नपत्रिका** :- एक. प्रश्नपत्रिकेचा तपशील खालीलप्रमाणे :-

| विषय (संकेतांक ०१३) | माध्यम | दर्जा | प्रश्नांची संख्या | एकूण गुण | कालावधी | प्रश्नपत्रिकेचे स्वरुप |
|---|---|---|---|---|---|---|
| मराठी, इंग्रजी, सामान्यज्ञान, बुद्धिमापन आणि अंकगणित | इंग्रजी विषयाकरिता इंग्रजी , इंग्रजी वगळता इतर विषयांकरिता मराठी | माध्यमिक शालांत परीक्षेसमान. | २०० | ४०० | दोन तास | वस्तुनिष्ठ बहुपर्यायी |

**५.२ अभ्यासक्रम** : -

(१) **मराठी**- व्याकरण, सोपी वाक्यरचना आणि नेहमीच्या शब्दांचा वापर .

(२) **इंग्रजी**- स्पेलिंग, व्याकरण, सोपी वाक्यरचना आणि नेहमीच्या शब्दांचा वापर.

(३) **सामान्यज्ञान**- दैनंदिन घटना, नेहमीचे अनुभव, धर्म, साहित्य, राजकारण, शास्त्र , सामाजिक व औद्योगिक सुधारणा, क्रीडा या क्षेत्रातील महान व्यक्तींची कार्ये, सर्वसाधारणपणे भारताच्या,विशेषकरुन महाराष्ट्राच्या इतिहासाची व भूगोलाची रुपरेषा यावरील प्रश्न.

(४) **बुध्दिमापन विषयक प्रश्न**- उमेदवार किती जलद व अचूकपणे विचार करु शकतो, हे आजमावण्यासाठी प्रश्न.

(५) **अंकगणित** - बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार, दशांश अपूर्णांक, सरासरी आणि टक्केवारी.

**६. परीक्षा केंद्र** : -

६.१ खालील ठिकाणी सदर परीक्षा घेण्यात येईल :-

| केंद्र | संकेतांक |
|---|---|
| अहमदनगर | ११ |
| अकोला | १२ |
| अलिबाग | १३ |
| अमरावती | १४ |
| औरंगाबाद | १५ |
| बीड | १६ |
| भंडारा | १७ |
| बुलढाणा | १८ |
| चंद्रपूर | १९ |
| धुळे | २० |
| गडचिरोली | २१ |
| गोंदिया | २२ |

| केंद्र | संकेतांक |
|---|---|
| हिंगोली | २३ |
| जळगाव | २४ |
| जालना | २५ |
| कोल्हापूर | २६ |
| कुडाळ | २७ |
| लातूर | २८ |
| मुंबई (मध्य) | ३० |
| मुंबई (पश्चिम) | ३१ |
| नागपूर | ३२ |
| नांदेड | ३३ |
| नंदुरबार | ३४ |
| नाशिक | ३५ |

| केंद्र | संकेतांक |
|---|---|
| उस्मानाबाद | ३६ |
| परभणी | ३७ |
| पुणे | ३८ |
| रत्नागिरी | ३९ |
| सांगली | ४० |
| सातारा | ४१ |
| सोलापूर | ४२ |
| ठाणे | ४३ |
| वर्धा | ४४ |
| वाशीम | ४५ |
| यवतमाळ | ४६ |
| पालघर | ४७ |

६.२ विहित पद्धतीने ऑनलाईन माहिती सादर करताना उमेदवारांनी केलेल्या मागणीनुसार व उपलब्धतेनुसार जिल्हाकेंद्रांवरील विविध उपकेंद्रांवर पात्र उमेदवारांना प्रवेश देण्यात येईल.

६.३ उपरोक्त परीक्षाकेंद्रांमध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ अथवा बदल होऊ शकतो.

६.४ उपरोक्त परीक्षाकेंद्रांमधून कोणतेही एक केंद्र ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करताना निवडणे आवश्यक आहे.

६.५ एखादे केंद्र कार्यान्वित होऊ शकले नाही तर त्या केंद्रावरील उमेदवारांची व्यवस्था जवळच्या दुस-या जिल्हाकेंद्रावर करण्यात येईल. असा बदल केल्यास त्याबाबतची सूचना संबंधितांना दिली जाईल.

६.६ अर्जात एकदा नमूद केलेल्या केंद्रामध्ये बदल करण्याची विनंती कोणत्याही कारणास्तव मान्य करण्यात येणार नाही.

**७. पदांचा पसंतीक्रम** : -

**७.१** प्रस्तुत परीक्षेसाठी ऑनलाईन पध्दतीने अर्ज सादर करताना ज्या पदासाठी अर्ज केला आहे, ते पद (लिपिक टंकलेखक मराठी अथवा लिपिक टंकलेखक इंग्रजी) नमूद करणे आवश्यक आहे. तसेच, दोन्ही पदांसाठी अर्ज करावयाचा असल्यास त्याप्रमाणे नमूद करणे आवश्यक आहे.

**७.२** परीक्षेचा अर्ज ऑनलाईन पध्दतीने सादर करताना पदांचा पसंतीक्रम दर्शविणे आवश्यक आहे. अशा प्रकारे पसंतीक्रम नमूद करण्याची फक्त एकच संधी खालील अटींवर देण्यात येईल :-

(१) पसंतीक्रम ऑनलाईन पध्दतीने व आयोगाकडून निश्चित करण्यात आलेल्या पध्दतीनुसार अर्जासोबत सादर करणे आवश्यक राहील.

(२) पसंतीक्रम दर्शविलेल्या पदाकरिता विहित मर्यादेचे अर्हता प्रमाणपत्र नसल्यास, संबंधित पदाचा पसंतीक्रम रद्द करण्यात येईल.

(३) पसंतीक्रम आयोगास सादर केल्यानंतर पदाच्या पसंतीक्रमात बदल करण्यासंबंधीच्या विनंतीचा कोणत्याही परिस्थितीत विचार केला जाणार नाही.

(४) विहित पद्धतीने पसंतीक्रम नमूद न केल्यास, जाहिरात / अधिसूचनेत नमूद केलेल्या पदक्रमांकानुसार त्यांचा पसंतीक्रम आहे, असे समजण्यात येईल व आयोगास अर्ज सादर केल्यानंतर बदल करण्याची विनंती मान्य केली जाणार नाही.

८. **लेखी परीक्षेचा निकाल** :-

८.१ वस्तुनिष्ठ स्वरुपांच्या उत्तरपत्रिकांचे मुल्यांकन करताना उत्तरपत्रिकेत नमूद केलेल्या योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच प्रत्येक चार चुकीच्या उत्तरामागे एका प्रश्नाचे गुण एकूण गुणांमधून वजा करण्यात येतील.

८.२ भरावयाच्या एकूण पदांपैकी प्रत्येक आरक्षित प्रवर्ग / उपप्रवर्गासाठी २ पट उमेदवार प्रमाणपत्र पडताळणीसाठी उपलब्ध होतील, अशा रितीने गुणांची किमान सीमारेषा (Cut Off Line) निश्चित करण्यात येईल. सदर सीमारेषा सर्व उमेदवारांसाठी एकच किंवा प्रत्येक सामाजिक प्रवर्ग/उपप्रवर्गासाठी तसेच महिला, खेळाडू इत्यादींसाठी वेगवेगळी असेल.

८.३ प्रत्येक प्रवर्ग / उपप्रवर्गासाठी आयोगाने निश्चित केलेल्या सीमारेषा किंवा त्यापेक्षा जास्त गुण मिळविणा-या उमेदवारांना त्यांनी अर्जामध्ये दिलेल्या माहितीच्या आधारे, ते विहित अटींची पूर्तता करतात असे समजून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात प्रमाणपत्र पडताळणीसाठी पात्र समजण्यात येईल.

८.४ विकलांग, अत्युच्च गुणवत्ताधारक पात्र खेळाडू अथवा माजी सैनिक या प्रवर्गाच्या किमान सीमा रेषेच्या आधारे मुलाखतीसाठी पात्र ठरणा- या उमेदवारास कोणतीही एकच सवलत घेता येईल.

८.५ निकाल जाहीर झाल्याची बातमी राज्यातील प्रमुख वृत्तपत्रांतून प्रसिद्ध करण्यात येईल.तसेच, मुलाखतीसाठी पात्र ठरलेल्या प्रत्येक उमेदवाराला ईमेलद्वारे व मोबाईल क्रमांकावर एसएमएसद्वारे वैयक्तिकरित्या कळविण्यात येईल.

८.६ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती तसेच उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याचे प्रमाणपत्र असलेल्या विमुक्त जाती (अ), भटक्या जमाती (ब), विशेष मागास प्रवर्ग, भटक्या जमाती (क), भटक्या जमाती (ड), व इतर मागास वर्ग या प्रवर्गातील उमेदवार तसेच अपंग, महिला, माजी सैनिक व पात्र खेळाडू उमेदवार लेखी परीक्षेत केवळ त्यांच्यासाठी विहित केलेल्या निम्न सीमारेषेनुसार अर्हताप्राप्त झाल्यास अंतिम शिफारशींच्या वेळी त्यांची उमेदवारी केवळ त्या त्या संबंधित प्रवर्गासाठी विचारात घेतली जाईल. निम्न सीमारेषेनुसार अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांची उमेदवारी सर्वसाधारण (अमागास) पदासाठी विचारात घेतली जाणार नाही.

९. **प्रमाणपत्र पडताळणी** :-

९.१ पात्र उमेदवारांना प्रमाणपत्र पडताळणीसाठी बोलविण्यात येईल.

९.२ आयोगाने निश्चित केलेल्या किमान सीमारेषेनुसार अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांची पात्रता जाहिरात/ शासन परिपत्रकातील अर्हता/अटी व शर्तीनुसार मूळ कागदपत्राच्या आधारे तपासली जाईल.

९.३ अर्जातील दाव्यानुसार मूळ कागदपत्र सादर करणा-या उमेदवारांची प्रमाणपत्र पडताळणी केली जाईल.

९.४ विहित कागदपत्रे सादर करू न शकणा-या उमेदवारांची उमेदवारी रद्द करण्यात येईल. तसेच त्याकरिता कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही.

९.५ वरीलप्रमाणे लेखी परीक्षेच्या निकालाचा आधारे पात्र ठरणा-या उमेदवारांची प्रमाणपत्र पडताळणी आयोगाच्या कार्यक्रमानुसार तसेच आयोगाने निश्चित केलेल्या ठिकाणी व वेळेस घेण्यात येतील.

१०. **अंतिम निकाल** : -

लेखी परीक्षेमध्ये प्राप्त केलेल्या गुणांच्या आधारे गुणवत्ताक्रमानुसार यादी (Merit List) तयार करण्यात येईल. सदर गुणवत्ता यादीमध्ये समान गुण धारण करणा -या उमेदवारांचा प्राधान्यक्रम (Ranking) **" उमेदवारांना सर्वसाधारण सूचना "** मध्ये नमूद केलेल्या निकषानुसार ठरविण्यात येइल.

**११. शिफारस** :-

**११.१ "उमेदवारांना सर्वसाधारण सूचना "** मध्ये नमूद केलेल्या कार्यपध्दतीनुसार उमेदवारांच्या शिफारसी शासनाच्या संबंधित विभागाकडे पाठविण्यात येईल.

**११.२** प्रस्तुत लेखी परीक्षेमधून शिफारसपात्र होण्याकरिता शतमत (**Percentile**) पध्दत लागू आहे. प्रस्तुत परीक्षेमध्ये सर्वाधिक गुण मिळविणा-या उमेदवारांच्या एकूण गुणांच्या खालीलप्रमाणे किमान गुण प्राप्त करणारे उमेदवार शिफारशीसाठी पात्र असतील :-

(१) **अमागास- किमान ३५ शतमत**
(२) **मागासवर्गीय -किमान ३० शतमत**
(३) **विकलांग- किमान १० शतमत**
(४)**अत्युच्च गुणवत्ताधारक पात्र खेळाडू – किमान २० शतमत**
(५) **माजी सैनिक –किमान २० शतमत**

**११. ३** विकलांग अथवा अत्युच्च गुणवत्ताधारक पात्र खेळाडू अथवा माजी सैनिक या प्रवर्गाच्या किमान सीमारेषेच्या आधारे शिफारशीसाठी पात्र ठरणा-या उमेदवारास कोणतीही एक सवलत घेता येईल.

**११. ४** परीक्षेस उपस्थित राहिलेल्या उमेदवारांना शिफारसीनंतर त्यांची नियुक्तीसाठी शिफारस करण्यात आली आहे किंवा नाही, ते ईमेलद्वारे कळविण्यात येईल. तसेच, शिफारस झालेल्या उमेदवारांची नावे आयोगाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात येतील.

************